**अहमदनगर जिल्ह्यातील अहमदनगर तालुक्यातील योजनाबाह्य रस्त्याचा ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.११६/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक- १९ डिसेंबर, २०१८.**

**पहावे** :-१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र. का-५/साबांप्राविना/प्रआ/रस्ते दर्जोन्नत/१७७४/२०१८ दि. ११/०४/२०१८.
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर यांचे पत्र क्र. रेशा/४९६८/सन-२०१८ दि. १६/११/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचेकडून संदर्भाधीन पत्रान्वये अहमदनगर जिल्ह्यातील अहमदनगर तालुक्यातील राज्यमार्ग -५८ ते विखे पाटील हॉस्पिटल ते नॉर्थस्टार ग्लोबल अॅकॅडमी स्कूल ते ग्रामीण मार्ग- ३२८ रस्ता या रस्त्याचा ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे. तसेच सदर रस्त्याबाबत जिल्हा परिषद, अहमदनगर ची मागणी आहे.

सदर ३.०० कि.मी. लांबीच्या रस्त्याकरीता भूसंपादनाची आवश्यकता नाही. सदर रस्त्याचे महत्त्व लक्षात घेता सदर रस्ता रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये ग्रामीण मार्ग म्हणून समाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, अहमदनगर यांची मागणी विचारात घेऊन, अहमदनगर जिल्ह्यातील अहमदनगर तालुक्यातील **राज्यमार्ग-५८ ते विखे पाटील हॉस्पिटल ते नॉर्थस्टार ग्लोबल अॅकॅडमी स्कूल ते ग्रामीण मार्ग-३२८ रस्ता** कि.मी. ०/०० ते ३/०० एकूण लांबी ३.०० कि.मी. हा रस्ता **ग्रामीण मार्ग क्र.३७५** म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्यात येत आहे.

परिणामी लांबीमध्ये रस्ते विकास योजना २००१-२१ मधील अहमदनगर जिल्ह्यातील **ग्रामीण मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **३.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (**१००८७.९८०** + **३.००**) म्हणजे **१००९०.९८० कि. मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१९१५३४५६८३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2018.12.19 15:42:16 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) **मुख्य** अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
२) उप सचिव,ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) विभागीय आयुक्त, नाशिक .
४) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,अहमदनगर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
५) जिल्हाधिकारी, अहमदनगर.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अहमदनगर.
७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर.
८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.